मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमास दोन वर्षे मुदतवाढ़ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२०/प्र.क्र.१६/पापु-१९

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ३१ ऑगस्ट, २०२०

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.७३/पापु-१९, दिनांक १८ मे, २०१७
५) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.११०/पापु-१९, दिनांक १४ जुलै, २०१७
६) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१४/पापु-१९ (शिकाना), दिनांक ११ जाने, २०१८
७) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१८/प्र.क्र.७२/पापु-१९, दिनांक २७ मार्च, २०१८
८) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.११०/पापु-१९, दिनांक २७ मार्च, २०१८

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण जनतेस शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक ०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते २०१९-२० या कालावधीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्यात येत आहे. सदर कार्यक्रमाचा कालावधी दि.३१ मार्च, २०२० रोजी संपुष्टात आला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या प्रगतीपथावरील/अपूर्ण पाणीपुरवठा योजनांची कामे पूर्ण करण्याकरिता प्रस्तुत योजनेस मुदतवाढ देणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने व या कार्यक्रमांतर्गत मंजूर पाणीपुरवठा योजनांची कामे पूर्ण करण्याच्या दृष्टीने "मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम" या योजनेस दोन वर्षे मुदतवाढ़ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

वरील परिस्थिती विचारात घेऊन मंत्रिमंडळाच्या दिनांक ०८ जुलै, २०२० रोजीच्या बैठकीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या प्रगतीपथावरील/अपूर्ण पाणी पुरवठा योजनांची कामे पूर्ण करण्याकरिता प्रस्तुत योजनेस दोन वर्षे (सन २०२१-२२ पर्यंत) मुदतवाढ देण्यास, तसेच यासाठी रु.४३०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या प्रगतीपथावरील/अपूर्ण पाणी पुरवठा योजनांची कामे पूर्ण करण्याकरिता प्रस्तुत योजनेस दोन वर्षे (सन २०२१-२२ पर्यंत) मुदतवाढ देण्यात येत आहे .

२. सदर कालावधीत कोणत्याही नवीन पाणीपुरवठा योजनांना मंजूरी देता येणार नाही. तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७१९, दि.१०.०८.२०२० अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३१११३८३५२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.08.31 13:39:14 +05'30'

**(वसंत भि. माने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्य मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, मुंबई.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. महालेखापाल, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

१०. मुख्य/अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग (सर्व)

११. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.

१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

१३. निवडनस्ती (पापु-१९)